माणगांव, जिल्हा-रायगड येथे नाटयगृह इमारतीच्या बांधकामासाठी पहिल्या हप्त्यातील उर्वरीत रक्कम वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : नागृबा-२०१३/प्र.क्र.५३/सां.का.१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० मार्च, २०२३.

वाचा : १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. नागृबा-२०१५/ प्र.क्र.८५/सां.का.१, दि.२९.०२.२०१६.
२) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. नागृबा-२०१३/ प्र.क्र.५३/सां.का.१, दि.०७.०४.२०१६.
३) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र. नागृबा-२०१३/ प्र.क्र.५३/सां.का.१, दि.११.०८.२०१७.
४) जिल्हाधिकारी, रायगड यांच्या कार्यालयाचे पत्र क्र.नपाप्र/ कार्या-४/प्र.क्र.८/नाट्यगृह/माणगाव/२०२३, दि.२०.०२.२०२३.
५) शासन ज्ञापन, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, क्र.संकीर्ण-२०२३/ प्र.क्र.४२/सां.का.१, दि.३०.०३.२०२३

**प्रस्तावना :**

जिल्हा पातळीवर बंदिस्त नाटयगृह बांधकामास मंजूरी देण्याची योजना उपरोक्त क्रमांक १ येथील दि.२९.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये कार्यरत आहे. या योजनेनुसार माणगांव, जिल्हा रायगड येथे नाटयगृह बांधकामाच्या रु.३९२.२१ लक्ष इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व आराखडयास सार्वजनिक बांधकाम विभागाने नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून एक विशेष बाब म्हणून उपरोक्त क्रमांक २ येथील दि.०७.०४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तद्नंतर नाटयगृह बांधकामासाठी दि.११.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये रु.३,९२,२१,२८४/- इतक्या खर्चास सुधारित प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार शासन हिश्श्याच्या रकमेचा पहिला हप्त्याची रक्कम रु.१,४९,०४,०८८/- इतक्या अनुज्ञेय रकमेपैकी, निधीच्या कमतरतेमुळे फक्त रु.१४,००,०००/- इतकी रक्कम वितरीत करण्यात आली होती. आता माणगांव, जिल्हा रायगड येथील बांधकामाकरीता शासन हिश्श्याच्या पहिल्या हप्त्यापोटी यापूर्वी वितरीत करण्यात आलेल्या रु.१४.०० लक्ष इतकी रक्कम वजा जाता उर्वरीत रक्कम रु.१,३५,०४,०८८/-वितरणाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

मौजे माणगांव, जिल्हा रायगड येथील नाटयगृह बांधण्यास शासन हिश्श्यापैकी पहिल्या हप्त्याची उर्वरीत रक्कम रु.१,३५,०४,०८८/- (रुपये एक कोटी पस्तीस लक्ष चार हजार अठ्ठयाऐंशी फक्त ) इतक्या खर्चाच्या कामास पुढील अटींच्या अधीन राहून अर्थसहाय्य मंजूर करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) या विभागाच्या शासन निर्णय दि.११ ऑगस्ट, २०१७ अन्वये विहित केलेल्या सर्व अटी व शर्तीचे पालन करणे जिल्हाधिकारी, रायगड यांना बंधनकारक राहिल.

२) वितरीत करण्यात आलेल्या पहिल्या हप्त्याच्या अर्थसहाय्याची रक्कम खर्च केल्याचे सनदी लेखापालांनी प्रमाणित केलेले विहीत नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र तसेच कामाचे भौतिक साध्य याबाबतची माहिती नियंत्रक अधिकारी म्हणजेच जिल्हाधिकारी, रायगड यांनी सादर केल्यानंतर शासनाच्या हिश्श्याची दुसऱ्या हप्त्याची अर्थसहाय्याची रक्कम वितरीत करण्यात येईल.

३) निधी वितरण व खर्च याबाबतचा अनुपालन अहवाल जिल्हाधिकारी, रायगड यांनी शासनास पाठवावा.

**२.** जिल्हाधिकारी, रायगड-अलिबाग यासाठी नियंत्रक अधिकारी राहतील व त्यांनी प्राधिकृत केलेल्या दुय्यम अधिकाऱ्यास या संबंधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

**३.** यासाठी होणारा खर्च मागणी क्र.झेडडी-२, २२०५ कला संस्कृती (००) १०२-कला व संस्कृती प्रचालन (०१)(०२) शासकीय प्रेक्षागृहे व सभागृहे (२२०५ १४८१) ३१-सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पीय वर्षात संदर्भ क्र. ५ च्या शासन ज्ञापनाअन्वये पुनर्विनियोजनाव्दारे प्राप्त झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**४.** हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १६२/२०२३/व्यय १५, दि.३०.३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२३०३२९१७०८४१५८२३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA HEMANT WAGHMARE

Digitally signed by VIDYA HEMANT WAGHMARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT,
2.5.4.20=4e214bf8a250420c28c2084d8dd965c0d454568322bd41981d48971712e51795, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F93EFE7B946BF26FF989D6E5E01E1B122B9EB4E3E4E6799CB8E82B2D33D58DFC, cn=VIDYA HEMANT WAGHMARE
Date: 2023.03.31 10:39:58 +05'30'

**( विद्या वाघमारे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता, विधान सभा, विधान परिषद, विधानमंडळ, मुंबई.
४. सर्व सन्माननीय विधानमंडळ सदस्य, महाराष्ट्र राज्य.
५. जिल्हाधिकारी, जिल्हा रायगड-अलिबाग
६. मुख्याधिकारी, माणगांव नगरपंचायत, माणगांव, जिल्हा रायगड.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड
८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.

९. महालेखापाल (लेखा परीक्षा), -१, महाराष्ट्र, मुंबई.
१०. नियोजन विभाग (का.१४४३) मंत्रालय, मुंबई.
११. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. वित्त विभाग (व्यय-१५) मंत्रालय, मुंबई.
१३. मा.मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४. अवर सचिव (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - अर्थसंकल्प शाखेने सदर रक्कम अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत करावी.
१५. निवड नस्ती, सां.का.१